महासमादेशक, गृह रक्षक दल व संचालक, नागरी संरक्षण हे महासंचालक दर्जाचे पद पुर्नजिवीत करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक : आयपीएस - १७१० / प्र.क्र. ३०३ / पोल -१
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक १७ जानेवारी, २०११.

**वाचा:** १) शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक:आयपीएस-१७०९/प्र.क्र.३२५/पोल-१, दिनांक १५.१०.२००९
२) शासन आदेश, गृह विभाग क्र. आयपीएस-१७१०/प्र.क्र.१८४/ पोल-१, दि.३१.५.२०१०

**प्रस्तावना :** -

राज्यातील महासमादेशक, गृह रक्षक दल व संचालक नागरी संरक्षण दल, महाराष्ट्र राज्य हे महासंचालक दर्जाचे पद दि. १.८.२००९ पासून खारिज करण्यात आले होते. तथापि, राज्यात गृह रक्षक दलाचे वाढते काम व जबाबदारी विचारात घेता, हे पद पुर्नजिवीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन आता खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

राज्यात महासमादेशक, गृहरक्षक दल व संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे एचएजी + रुपये ७५,५००-८०,०००/- या वेतनश्रेणीतील महासंचालक दर्जाचे पद दिनांक ०१.०६.२०१० पासून पुर्नजिवित करण्यात येत आहे

२. वरील पदाच्या निर्मितीमुळे होणारा खर्च हा "२०७०-इतर प्रशासकीय सेवा, (१०६), नागरी संरक्षण (तीन) नागरी संरक्षण संघटना" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक: २३४/व्यय-७, दिनांक २९.१२.२०१० अन्वये प्राप्त झालेल्या त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०११७२०१२४१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

**( कैलास वि. बिलोणीकर )**
**अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.**

- मा.राज्यपाल यांचे सचिव
- मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
- मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव

- मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
- मा.राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
- मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
- अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
- प्रधान सचिव (अपिल व सुरक्षा) यांचे स्वीय सहाय्यक
- प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
- महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
- महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, मुंबई
- महासंचालक, विशेष कृती, महाराष्ट्र राज्य, मुंबई
- उपमहासमादेशक, गृहरक्षक दल व उपसंचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
- महालेखापाल - १ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), महाराष्ट्र राज्य, मुंबई
- महालेखापाल - २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), महाराष्ट्र राज्य, नागपूर
- अधिदान व लेखा अधिकारी / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
- गृह विभागातील सर्व कार्यासने
- वित्त विभाग/ व्यय-७, मंत्रालय, मुंबई
- लेखा अधिकारी, भापोसे कक्ष, गृह विभाग
- निवड नस्ती